**अनुसूचित जमातीच्या मुलां-मुलींना परदेशात शिक्षणासाठी शिष्यवृत्ती देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांक -आदिशी- १२०३/प्र.क्र. ७६/ का-१२
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - ३१ मार्च , २००५

**प्रस्तावना** - राज्यातील मागासवर्ग गटामध्ये आदिवासी समाज सामाजिक, शैक्षणिक व आर्थिकदृष्टया अतिमागासलेला आहे. परिणामी, सर्व प्रतिकूल परिस्थितीमुळे अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाच्या संधी उपलब्ध होत नाहीत. या विद्यार्थ्यामध्ये गुणवत्ता असून देखील आर्थिक परिस्थितीमुळे त्यांना उच्च शिक्षणापासून वंचित रहावे लागते. अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना परदेशातील शिक्षणाची संधी मिळावी व त्यांच्या गुणवत्तेला वाव मिळावा म्हणून परदेशातील विद्यापीठामध्ये विविध अभ्यासक्रमासाठी ज्या आदिवासी विद्यार्थ्यांना प्रवेश मिळेल अशा एकूण १० विद्यार्थ्यांचा परदेशातील शिक्षणाचा खर्च भागविण्यासाठी अनुदान म्हणून शिष्यवृत्ती मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** परदेशातील विद्यापिठात उच्च शिक्षणासाठी प्रवेश घेतलेल्या राज्यातील अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना त्या विद्यापीठातील उच्च शिक्षणाचा खर्च भागविण्यासाठी सन २००५-०६ या वर्षापासून शिष्यवृत्ती देण्यास या शासन निर्णयाद्वारे शासन मंजूरी देत आहे. ही शिष्यवृत्ती खाली नमूद केलेल्या नियमावलीतील अटी व शर्तीनुसार अनुज्ञेय होईल:-

**शिष्यवृत्ती योजनेची नियमावली.**

१) राज्यातील आदिवासी विद्यार्थ्यांना विदेशी शिक्षणाच्या संधी उपलब्ध करुन देण्यासाठी अनुसूचित जमातीच्या एकूण १० विद्यार्थ्यांना पदवी आणि पदव्युत्तर शिक्षणासाठी शिष्यवृत्ती देण्यात येईल. १० विद्यार्थ्यांपेक्षा जास्त विद्यार्थ्यांचे अर्ज प्राप्त झाले तर त्या विद्यार्थ्यांना त्यांनी १२ वी आणि पदवी अभ्यासक्रमात मिळविलेल्या गुणांप्रमाणे प्राधान्य देण्यात येईल.

२) सदर शिष्यवृत्ती खाली नमूद केलेल्या पदवी आणि पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी त्यासमोर नमूद केलेल्या संख्येच्या प्रमाणात मंजूर करण्यात येईल.

| अ.क्र | अभ्यासक्रमाचे नाव | स्तर | शिष्यवृत्ती संख्या | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | पदवी | पदव्युत्तर | एकूण लाभार्थी |
| अ) | एम.बी.ए. | पदव्युत्तर | -- | २ | २ |
| ब) | वैद्यकीय अभ्यासक्रम | पदवी/ पदव्युत्तर | १ | १ | २ |
| क) | बी.टेक.(इंजिनिअरिंग) | पदवी/पदव्युत्तर | १ | १ | २ |
| ड) | विज्ञान | पदवी/पदव्युत्तर | -- | १ | १ |
| इ) | कृषि | पदवी /पदव्युत्तर | -- | १ | १ |
| इ) | इतर विषयांचे अभ्यासक्रम | पदवी /पदव्युत्तर | -- | २ | २ |
| | | | २ | ८ | १० |

A: C.R.76-03 Ó

शिष्यवृतीची वरीलप्रमाणे संख्या निश्चित केली असली तरी पदव्युतर अभ्यास क्रमाच्या विद्यार्थ्यांना प्राधान्य देण्यात येईल तथापि असे उमेदवार ज्या वेळी उपलब्ध होणार नाहीत यावेळी पदवी अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांची निवड करण्यात येईल.

त्याचप्रमाणे वर नमूद केलेली शिष्यवृतीची संख्या (क्षमता) एका अभ्यासक्रमाकडून दुस-या अभ्यासक्रमासाठी वापरली जाईल.

३) उमेदवारांची निवड करताना भूमिहिन आदिवासी कुटुंबातील विद्यार्थी, दुर्गम भागातील विद्यार्थी तसेच आदिवासी आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना या शिष्यवृत्तीसाठी प्राधान्य देण्यात येईल.

४) विद्यार्थी महाराष्ट्र राज्याचा रहिवासी असावा.

५) विद्यार्थी महाराष्ट्रातील अनुसूचित जमातीचा असावा.(सदर विद्यार्थ्याकडे जातीचे वैधता प्रमाणपत्र असावे.)

६) या शिष्यवृत्तीसाठी विद्यार्थ्याचे वय जास्तीत जास्त ३८ वर्षापर्यत असावे.

तथापि नोकरी करीत असलेल्या विद्यार्थ्याच्या बाबतीत उच्च वयोमर्यादा ४५ वर्षापर्यंत राहील.परंतु नोकरीत नसलेल्या उमेदवारास निवडीच्या वेळी प्राधान्य राहील.

७) विद्यार्थ्याला परदेशातील मान्यताप्राप्त विद्यापीठामध्ये प्रवेश मिळालेला असावा.

८) या शिष्यवृत्तीसाठी पात्र ठरणाऱ्या विद्यार्थ्याच्या कुटुंबाची वार्षिक उत्पन्न मर्यादा जास्तीत जास्त रुपये २.५० लक्ष (रु. दोन लक्ष पन्नास हजार फक्त) पर्यत राहील.

९) सदर शिष्यवृत्ती अदिवासी कुंटुबातील केवळ एकाच व्यक्तीस (मुलगा /मुलगी) आणि एका अभ्यासक्रमासाठी अनुज्ञेय होईल.

१०) शिष्यवृत्तीसाठी पात्र ठरणा-या विद्यार्थ्याला त्यांने निवडलेला अभ्यासक्रम अर्धवट सोडल्यास अभ्यासक्रमासाठी शासनामार्फत खर्च करण्यात आलेली संपूर्ण रक्कम त्याच्याकडून वसूल करण्यात येईल. तसेच अभ्यासक्रम पुर्ण झाल्यानंतर भारतामध्ये परत येणे किंवा किमान पाच वर्षे भारतामध्ये सेवा करणे बंधनकारक राहील. या अटी मान्य असल्याचे संदर्भातील लेखी हमीपत्र (बॉन्ड) दोन जामीनदारासह सादर करावे लागेल.

११) परदेशातील अभ्यासक्रमासाठी एकदा निश्चित केलेला कालावधी वाढवता येणार नाही. अथवा मंजूरी घेते वेळी जो अभ्यासक्रम निवडला होता त्यात बदल करता येणार नाही.

१२) नोकरीत असलेल्या विद्यार्थ्याला या शिष्यवृत्तीसाठी सादर करावयाचा अर्ज त्याच्या नियोक्त्यामार्फत सादर करणे बंधनकारक राहील.

१३) शिष्यवृत्तीसाठी निवड झालेल्या विद्यार्थ्यास,परदेशातील निवास, अभ्यासक्रमाच्या कालावधी पलिकडे कोणत्याही परिस्थितीत वाढविता येणार नाही.

१४) परदेशातील ज्या अभ्यासक्रमासाठी विद्यार्थ्याची निवड झाली आहे त्या देशाचे पारपत्र प्राप्त करण्याची जबाबदारी संबंधीत विद्यार्थ्यांची राहील. याबाबतीत राज्य अथवा केंद्र शासनाचे कोणतेही अर्थसहाय्य उपलब्ध होणार नाही.

१५) उमेदवारांने चुकीची माहिती / खोटे कागदपत्र सादर केल्याचे आढळून आल्यास त्या उमेदवारावर झालेला खर्च १५ टक्के व्याजासह उमेदवारांकडून वसूल करण्यात येईल आणि त्याचे नाव काळ्या यादीमध्ये टाकण्यात येईल.

१६) ज्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्यात येईल, त्यामध्ये पहिल्या वर्षी शिक्षण फी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्यामार्फत थेट संबंधित विद्यार्थ्यास अदा करण्यात येईल आणि निर्वाह भत्ता दरवर्षी त्या शिक्षण संस्थेने ठरवून दिल्याप्रमाणे किंवा भारत सरकारच्या

Department of Personnel & Training विभागाने विदेशी शिष्यवृत्तीसाठी ठरवून दिलेल्या दराप्रमाणे येणारा खर्च या सर्व बाबींचा विचार करुन आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे देय होणारा निर्वाह भत्ता मंजूर करतील. दुस-या वर्षी विद्यार्थ्याने ज्या विद्यापीठामध्ये प्रवेश घेतला आहे. त्या विद्यापीठांच्या विद्यार्थ्यांची प्रगती व उपस्थिती बाबतच्या प्रमाणपत्रानंतर अदा करण्यात येईल. याबाबत आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना जरुर वाटल्यास भारतीय दुतावास किंवा इतर माध्यमातूनसुध्दा ते माहिती मागवतील.

१८) विद्यार्थ्यांनें अभ्यासक्रम अर्धवट सोडल्यास अभ्यासक्रमासाठी शासनामार्फत खर्च करण्यात आलेली संपूर्ण रक्कम जमीन महसूल संहिता मधील तरतूदीनुसार त्यांच्याकडून वसूल करण्यात येईल.

१९) विद्यार्थ्याने शिक्षणानंतर नोकरी मिळाल्यावर त्याच्यासाठी शासनामार्फत खर्च करण्यात आलेल्या रक्कमेपैकी त्याच्या स्वेच्छेने १० टक्के रक्कम ५ वर्षामध्ये शासनामार्फत स्थापन करण्यात आलेल्या अनुसूचित जमातीसाठीच्या निधीमध्ये ( आदिवासी उपयोजना निधी ) जमा करावी अशी अपेक्षा आहे.

२०) जाहिरात प्रसिध्दी, स्टेशनरी व इतर बाबींसाठी येणाग खर्च मंजूर तरतूदीमधून करावा.

२१) या शिष्यवृत्तीसाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडे अर्ज करणे आवश्यक राहील. त्यासंदर्भात त्यांना योजनेचे नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२२) शिष्यवृत्तीसाठीच्या अर्जासोबत खालील कागदपत्रे जोडणे आवश्यक आहे.

अ) जातीचा वैध दाखला.

ब) सक्षम प्राधिका-याचा उत्पन्नाचा दाखला.

क) परदेशातील विद्यापीठामध्ये प्रवेश मिळाल्याबाबतचे त्या विद्यापीठाचे पत्र व संबंधित विद्यापीठाच्या प्रॉस्पेक्टसची प्रत.

ड) परदेशातील ज्या अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतला आहे त्या अभ्यासक्रमाशी संबधित असलेल्या शाखेतील /विभागातील दोन विद्यैकनिष्ठ /फॅकल्टी यांचे शिफारसपत्र (Reference).

इ) अभ्यासक्रमासाठी शैक्षणिक शुल्कासह येणा-या एकूण खर्चाचे संस्थेचे प्रमाणपत्र.

२३) या शिष्यवृत्तीसाठी प्राप्त झालेल्या अर्जाची छाननी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती राहील.

| | |
|---|---|
| १. प्रधान सचिव , आदिवासी विकास विभाग, | -- अध्यक्ष. |
| २. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, | -- सदस्य. |
| ३. संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, | -- सदस्य. |
| ४. अपर आयुक्त, आदिवासी विकास नागपूर | -- सदस्य. |
| ५. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | --सदस्य सचिव |

२४) या योजनेंतर्गत शिष्यवृत्ती मिळण्यासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे स्थानिक व इतर प्रमुख वर्तमान पत्रामध्ये जाहिरात देऊन अर्ज प्राप्त करुन घेतील. जाहिरातीनुसार प्राप्त झालेले अर्ज आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी समितीपुढे सादर करावेत. विद्यार्थ्यांनी केलेल्या अर्जाबाबत प्रत्यक्ष छाननी करण्यासाठी समिती विद्यार्थ्याची मुलाखत आयोजित करेल.समितीकडून एकूण १० विद्यार्थ्यांची निवड करण्यात येईल.

२. सदर योजनेचा खर्च मागणी क्रमांक टी-४, "२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण" पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - जनजातीक्षेत्र उपयोजना- २७७- शिक्षण- ०२, माध्यमिक शालांत परिक्षेत्तर शिष्यवृत्या-शिष्यवृत्या विद्यावेतने (०२) (०१) राज्ययोजनांतर्गत योजना

(२२२५ १५६२)-४०, शिष्यवृत्या व विद्यावेतने या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात येणा-या तरतूदीमधून भागवावा. या योजनेसाठी निधी विहीत मार्गाने अर्थसंकल्पीत झाल्याशिवाय कोणताही खर्च करु नये. या योजनेसाठीची तरतूद आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे अधिनस्त ठेवण्यात येईल. सदर योजनेसाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १६२/०५/व्यय-१४, दि.२५.२.२००५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

मफिउल हुसेन

**(मफिउल हुसेन)**
**सह सचिव**

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव
मा. मंत्री, आ.वि. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
मा. राज्यमंत्री, आ.वि. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
मा. प्रधान सचिव ( आदिवासी विकास विभाग ) मंत्रालय, मुंबई -३२
मा.प्रधान सचिव (सामाजिक विकास व समन्वय)सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
मा.प्रधान सचिव उच्च व तंत्र शिक्षण विभाग मंत्रालय,मुंबई-३२
मा.प्रधान सचिव वैद्यकीय शिक्षण औषधी द्रव्ये विभाग मंत्रालय,मुंबई-३२
मा.प्रधान सचिव सामाजिक न्याय व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र -१ / २, मुंबई / नागपूर.
महालेखापाल ( लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-१ /२, मुंबई / नागपूर
महासंचालक, माहिती व प्रसिध्दी संचालनालय, मंत्रालय, मुंबई -३२
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / नागपूर / अमरावती
संचालक,तंत्र शिक्षण संचालनालय महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक,वैद्यकीय शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प..
वित्त विभाग, व्यय-१४/ १७, मंत्रालय, मुंबई -३२
सर्व कार्यासने , आदिवासी विकास विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई-३२
निवड नस्ती, कार्यासन-१२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.